देवघर मध्यम प्रकल्प ता. कणकवली,
जि. सिंधुदुर्ग, चतुर्थ सुधारित प्रशासकीय
मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१९/३१२/(प्र.क्र. ९६/१९)/मध्यम प्रकल्प
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०८ डिसेंबर, २०२१.

संदर्भ: - १)शासन निर्णय क्रमांक डीईओ/१०७८/९०२ (२३१३)/मप्र-१ दिनांक २१/०३/१९७९.
२) शासन निर्णय क्रमांक डीईओ/१०९३/ १६००/ (२७५/९३)/मप्र दिनांक१८/०१/१९९४.
३) शासन निर्णय क्रमांक देवघर १०.०१/८११ (२०४/२००१) /म.प्र. दिनांक १५/०१/२००२.
४) शासन निर्णय क्रमांक देवघर २००५/५४५/ (१७३/२००६)/मप्र दिनांक ०८/०१/२००७.
५) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्रमांक कोपाविम/तां-३/देवघर सुप्रमा /१५२६, दिनांक २६/०४/२०१९.
६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्यअस-२०२१/प्र.क्र.१०१/अर्थ-२ दिनांक २०/०८/२०२१.

प्रस्तावना:-

देवघर मध्यम प्रकल्पांतर्गत ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग येथे देवघर नदीला मिळणा-या कुर्ली नाल्यावर मातीचे धरण बांधण्यात आले आहे. सदर प्रकल्प कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ अंतर्गत "उर्वरीत महाराष्ट्र" या प्रदेशांतर्गत आहे. या प्रकल्पांतर्गत डाव्या व उजव्या कालव्याव्दारे कणकवली तालुक्यातील २५४६ हेक्टर व वैभववाडी तालुक्यातील १९६६ हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली आणण्याचे नियोजित आहे. अशा प्रकारे प्रकल्पाव्दारे एकूण ४५१२ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे.

देवघर मध्यम प्रकल्प ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग या प्रकल्पास संदर्भ क्रमांक १ नुसार सन १९७६-७७ चे दरसूचीवर आधारित रूपये १५.४८ कोटी इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्रमांक २ नुसार सन १९९२-९३ चे दरसूचीवर आधारित रूपये ७०.९८ कोटी इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तद्नंतर संदर्भ क्रमांक ३ नुसार सन १९९९-२००० चे दरसूचीवर आधारित रूपये १७४.९८ कोटी इतक्या रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तद्नंतर संदर्भ क्रमांक ४ नुसार सन २००३-०४ चे दरसूचीवर आधारित रूपये २४९.७९ कोटी इतक्या रकमेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती.

कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी संदर्भ क्रमांक ५ अन्वये सन २०१६-१७ चे दरसूचीवर आधारीत रुपये ४५१.४८ कोटी किंमतीचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर केला होता. या चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाच्या या निर्णयाव्दारे देवघर मध्यम प्रकल्प ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग या प्रकल्पाच्या सन २०१६-१७ चे दरसूचीवर आधारीत रुपये ४५१.४८ कोटी किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रूपये ४१४.४४ कोटी कामाप्रीत्यर्थ व रुपये ३७.०४ कोटी अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे. उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक ०९ /२०२१ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम नियोजित वेळेत व मंजूर चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, - मध्यम पाटबंधारे प्रकल्प - देवघर मध्यम प्रकल्प (योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली खर्च टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५.१) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्दा क्र. १ ते २७ मधील निरीक्षणांची पूर्तता करावी.

५.२) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

५.३) प्रगतीपथावरील निविदांची कामे प्राधान्याने पूर्ण करण्यात यावी. पाणीसाठ्याचा सिंचनाकरिता जास्तीत जास्त लाभ होईल अशाप्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे / निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

५.४) संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.

५.५) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्त अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंबलबजावणी करण्यात यावी.

५.६) सदर सुधारित प्रशासकीय मान्यतेमुळे प्रकल्प कार्यान्वयीकरणाच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमितता नियमित केल्या आहेत, असे गृहित धरता येणार नाही.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग (कार्यासन १४३४), अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५३/ २०२०/ का.१४३४ दिनांक ०३/११/२०२०, वित्त विभाग (कार्यासन व्यय-१२), अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७९/ २०२०/ व्यय-१२, दिनांक ०७/१२/२०२० नुसार प्राप्त सहमती व संदर्भीय पत्र क्रमांक ६ अन्वये निर्गमित

करण्यात आलेल्या व्यय- अग्रक्रम समितीच्या दिनांक १२/०७/२०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२०८१२५१३२५२२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDARSHAN S PAGAR

Digitally signed by SUDARSHAN S PAGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=95b5f6a99fdcc4631767c833a50534e996a5ea1900d3f79331fb96854705c87d, pseudonym=989CACFA50CF296E955238961F226C1545E058BC, serialNumber=9B98E5C84BE2C433987CDBBB01F1BA1BFA5CB3F02E2121B7D70F0CB6401C1074, cn=SUDARSHAN S PAGAR
Date: 2021.12.08 13:04:49 +05'30'

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

**( सुदर्शन पगार )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
१५) उपसचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सिंधुदुर्गनगरी, ओरस.
१८) कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभागीय पथक, अंबडपाल.
१९) वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

देवघर मध्यम प्रकल्प ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग
चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता
उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा
शासन निर्णय क्र.- सुप्रमा-२०१९/३१२/(प्र.क्र.९६/१९)/मध्यम प्रकल्प दिनांक ०८/१२/२०२१ चे सहपत्र.

(रुपये लक्ष)

| उपशिर्ष | मंजूर तृतीय सुप्रमा नुसार तरतुद | चतुर्थ सुप्रमा नुसार तरतुद | वाढ/घट (+/-) |
|---|---|---|---|
| [A] शीर्षकामे | | | |
| ए- प्राथमिक | १८.०८ | १७.५८ | -०.५० |
| बी- जमीन | ११७७.०२ | १३९६.७५ | २१९.७३ |
| सी- कामे | १४१७५.८२ | २०१८०.२५ | ६००४.४३ |
| डी- विमोचक | ४९७.५५ | १५९६.७६ | १०९९.२१ |
| के- इमारती | १६२.७९ | १७७.५८ | १४.७९ |
| एम- वृक्षारोपण | १.८४ | ५.३३ | ३.४९ |
| ओ- संकीर्ण | १९३.३१ | २१४.८५ | २१.५४ |
| पी -देखभाल | २८८.१३ | ३१७.२४ | २९.११ |
| क्यु -स्पेशल टी अँड पी | २६.७५ | २६.७५ | ०.० |
| आर -दळणवळण | ८८४.५७ | १०३९.६५ | १५५.०८ |
| **एकूण (अ)** | **१७४२५.८५** | **२४९७२.७४** | **७५४६.८९** |
| (ब) कालवे व वितरण व्यवस्था | | | |
| ए- प्राथमिक | १३.७७ | १६८.८३ | १५५.०६ |
| बी -जमीन | २०४.३७ | १६५४.३४ | १४४९.९७ |
| डी- विमोचक | १२७.८५ | २६८.०३ | १४०.१८ |
| इ -प्रपात | २३.७९ | २४.५४ | ०.७५ |
| एफ- RHT वर्क्स | ३२७.०० | १०१४.०६ | ६८७.०६ |
| जी -पुल | ६६.८४ | २५३.५३ | १८६.६९ |
| एच -निकासी | ३०.०० | ७२.१७ | ४२.१७ |
| के- इमारती | १२.७९ | ३२.०५ | १९.२६ |
| एल- मातीकाम | ७३८.३२ | २९६१.५० | २२२३.१८ |
| एम- वृक्षारोपण | ५.५० | ३२.०२ | २६.५२ |
| ओ- संकीर्ण | १९.७३ | २१.३१ | १.५८ |
| पी- देखभाल | ६.६१ | १४८.९९ | १४२.३८ |
| क्यु -स्पेशल टी अँड पी | २.५६ | २.५६ | ०.०० |
| आर- दळणवळण | ५०.०० | १६६.२४ | ११६.२४ |
| यु -वितरण व्यवस्था | १५५७.०२ | ९६५१.०१ | ८०९३.९९ |
| व्ही- शेतचारी | ०.०० | ०.०० | ०.०० |
| **एकूण (ब)** | **३१८६.१५** | **१६४७१.१८** | **१३२८५.०३** |
| **क)एकूण कामे(अ+ ब)** | **२०६१२.००** | **४१४४३.९२** | **२०८३१.९२** |
| ड)आस्थापना व इतर खर्च | ४३६६.७१ | ३७०४.२४ | -६६२.४७ |
| **एकूण (क+ ड)** | **२४९७८.७१** | **४५१४८.१६** | **२०१६९.४५** |

**ठळक बाबी**

अ) योजनेचे सिंचन क्षेत्र (ICA) ६२०० हेक्टर .

ब) लाभव्यय गुणोत्तर: २.५८ (> १.५)

क) आर्थिक परतावा दर (IRR): १०.०५%